राज्यातील प्रत्येक शैक्षणिक विभागामध्ये एक याप्रमाणे आनंद गुरुकुल (विशेष नैपुण्य) निवासी शाळा स्थापन करण्याकरीता शासनास शिफारस करण्यासाठी समिती गठित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्र. नमाशा-१४२५/प्र.क्र.४९/एसएम-२**
मंत्रालय (विस्तार), मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०००३२,
दिनांक:- १६ एप्रिल, २०२५

**प्रस्तावना :-**

राज्यातील प्रत्येक शैक्षणिक विभागात इयत्ता ९ वी ते इयत्ता १२ वी करीता (माध्यमिक व उच्च माध्यमिक) १ या प्रमाणे ८ विभागात ८ आनंद गुरुकुल (विशेष नैपुण्य) निवासी शाळा स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. या निवासी शाळा २०० पटसंख्येच्या क्षमतेच्या विकसित करण्याचे विचाराधीन असून या शाळांमध्ये इयत्ता ९ वी ते इयत्ता १२ वी च्या नियमित शैक्षणिक अभ्यासक्रमाबरोबरच २१ व्या शतकाची गरज विचारात घेऊन क्रीडा, कला, शास्त्र व तंत्रज्ञान, अपारंपारिक ऊर्जा, संवाद कौशल्य, वित्तीय सेवा, व्यवस्थापन, आरोग्य सेवा, जागतिक पर्यटन, कृत्रिम बुध्दिमत्ता, शाश्वत विकास इ. विषयांच्या विशेष नैपुण्य शाखांचा अभ्यास शिकविण्याचे विचाराधीन आहे. याचा मुळ उद्देश विद्यार्थ्यांना या विशेष नैपुण्य विषयांच्या अभ्यासक्रमाचे शिक्षण दिल्यास त्यांना भविष्यात त्या-त्या क्षेत्रातील उच्च शिक्षणाची गोडी निर्माण होऊन, त्या विषयातील योगदान व देशात उच्च दर्जाचे मनुष्यबळ निर्माण करणे व शैक्षणिक विकासाबरोबर विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्वाचा सर्वांगिण व शाश्वत विकास करणे असा आहे. या निवासी शाळा शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून सुरु करण्याचे प्रस्तावित आहे.

त्यानुसार (१) आनंद गुरुकुल (विशेष नैपुण्य) निवासी शाळांची स्थळ निश्चिती करणे (२) शालेय अभ्यासक्रमाव्यतिरिक्त विशेष नैपुण्य विषयांचा अभ्यासक्रम ठरविणे (३) प्रवेश पध्दती निश्चित करणे व (४) या शाळांची नियमित कार्यपध्दती, दिनदर्शिका ठरविणे या बाबींच्या अनुषंगाने अभ्यास करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यासगट नियुक्त करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेतील विवेचन विचारात घेता, उपरोक्त चार बाबींचा अभ्यास करून शासनास सर्वसमावेशक अहवाल सादर करण्याकरीता खालील प्रमाणे अभ्यासगटाची नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| १. | आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे | **अध्यक्ष** |
| २. | राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई | सदस्य |
| ३. | संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ४. | शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ५. | उप सचिव (शाळा व्यवस्थापन), शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६. | शिक्षण सहसंचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य सचिव |

तसेच, शालेय अभ्यासक्रमाव्यतिरिक्त प्रस्तावनेत नमूद विशेष नैपुण्य विषयांचा अभ्यासक्रम ठरविणे व या शाळांची नियमित कार्यपध्दती, दिनदर्शिका ठरविणे या करीता संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली उप समिती गठित करण्यात येत आहे. या उप समितीने आपला अहवाल समितीचे अध्यक्षांना तात्काळ सादर करावा. उपसमिती सदस्यांबाबत आवश्यक निर्णय घेण्याचे अधिकार संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्रदान करण्यात येत आहेत.

२. **समितीची कार्यकक्षा :-**

राज्यातील ८ शैक्षणिक विभागांपैकी पाच शैक्षणिक विभागातील धुळे, संभाजीनगर, यवतमाळ, सातारा व अमरावती या पाच जिल्हयांमध्ये शासकीय विद्यानिकेतने सुरु आहेत. या व्यतिरिक्त अन्य तीन शैक्षणिक विभागात शासकीय निकेतनाप्रमाणेच सुविधा उपलब्ध असलेल्या व सध्या सुरु असलेल्या शाळांपैकी सुस्थितीत असलेल्या व विकसनाकरीता वाव असलेल्या सुयोग्य शाळांची ( प्रति विभाग - एक शाळा ) निवड करण्यात यावी. तसेच, शासकीय विद्यानिकेतनमध्ये उपलब्ध असलेल्या वर्गखोल्या त्यांचे आकारमान/क्षेत्रफळ, उपलब्ध असलेल्या विविध सुविधा (प्रयोगशाळा,संगणक प्रयोगशाळा, हॉल/सभागृह इ.) विद्यानिकेतन / शाळांच्या जागांचे एकूण क्षेत्रफळ, भौत्तिक सुविधांची सद्य:स्थिती इत्यादी बाबतची सविस्तर माहिती घेण्यात यावी. तसेच, निवासाच्या सोयीसाठी असलेल्या सुविधांची माहिती घेऊन या कार्यक्रमाच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता लागणाऱ्या अतिरिक्त सुविधा व त्यासाठी लागणारा आवश्यक निधी विचारात घेऊन शासनास परिपूर्ण प्रस्ताव सादर करणे.

**उपसमितीची कार्यकक्षा** :-

क्रीडा, कला, शास्त्र व तंत्रज्ञान, अपारंपारिक ऊर्जा, संवाद कौशल्य, भाषण कौशल्य, वित्तीय सेवा, व्यवस्थापन, आरोग्य सेवा, जागतिक पर्यटन, कृत्रिम बुध्दिमता, शाश्वत विकास इ. विशेष नैपुण्य शाखांचा समावेश अभ्यासक्रमात करणेबाबतचा सविस्तर अहवाल सादर करावा.

३. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपसमितीच्या अहवालासह समितीचा अहवाल तात्काळ शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४१६१३१४२१२२२१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT., 2.5.4.20=57b66327fd02392673b4ab4d6a85fdd38e27f3be70b7a6bddc9bea3f08d2330b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF01D0AB2AFFB124678E1A586450069BBD9E2CBC928A89E57C1B37706CB9F428, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2025.04.16 13:15:16 +05'30'

**( समीर सावंत )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई

३. मा. उप मुख्यमंत्री ( वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
४. मा. उप मुख्यमंत्री ( नगर विकास ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (क्रीडा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (शालेय शिक्षण), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
११. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. सहसंचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१५. निवडनस्ती (एसएम-२)